# <u>महाराष्ट्र शासन</u>

क्र.प्रतिनि-२०१८/प्र.क्र.१५२/का.१४
सामान्य प्रशासन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक:- ११.९.२०१८

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

विषय- मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ येथील सह व्यवस्थापकीय संचालक हे पद **अवर सचिव** संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

महोदय,

अल्पसंख्यांक विकास विभागाच्या अधिपत्याखालील मैलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ येथील **सह व्यवस्थापकीय संचालक** हे पद प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. सदर पद मंत्रालयीन अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांमधून भरावयाचे आहे.

२. सदर पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरीता इच्छुक असलेल्या व सदर पदासाठी आवश्यक असलेली अर्हता तसेच अनुभव धारण करीत असलेल्या आपल्या विभागातील अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांची नावे, त्यांच्या मागील ३ वर्षांचे गोपनीय अहवालांसह, पत्रासोबत जोडलेल्या BIO-DATA/CURRICULUM VITAE PROFORMA मधील वैयक्तिक माहिती व ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र इ. बाबतच्या माहितीसह या विभागाकडे दि.२९.०९.२०१८ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने कृपया पाठवावीत. तसेच इच्छुक अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीसाठी निवड झाल्यास त्यांना संबंधित विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे याबाबतही कृपया अभिप्राय द्यावेत. आपल्या विभागातून प्रतिनियुक्तीसाठी कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही कृपया कळविण्यात यावे. एकदा निवड झालेल्या अधिकाऱ्याला त्याचे नाव मागे घेता येणार नाही.

३. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१११६०९५००८०७ असा आहे.

**आपला,**

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.09.11 16:15:24 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- विवरणपत्र**

प्रत ,

अल्पसंख्याक विकास विभाग /कार्या.०८,मंत्रालय मुंबई.

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ५ | मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | |
| ६ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | |
| ७ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ८ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | दिनांकापासून ते दिनांकापर्यंत / पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण<br>एकूण कालावधी |
| ९ | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| १० | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| ११ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |